जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमध्ये गट पातळीवरील यंत्रणा अधिक बळकट करण्यासाठी विस्तारअधिकारी (ए .ग्रा.वि.का.) व (उद्योग) यांची ८६ पदे निर्माण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय, क्रमांकः जिग्राप्र-२०११/प्र क्र-४५/योजना-५
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २१ ऑक्टोबर, २०११.

**वाचा** :- १) क्रमांकः आयआरडीपी-१०८२/प्र.क्र. ३७/४५, दिनांक : १२ एप्रिल, १९८३.
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांकः आयआरडी-१०८४/प्र.क्र. ८४८/५१, दिनांक : १९ ऑगस्ट, १९८५.
३) क्रमांकः आयआरडी-१०९७/प्र.क्र. १३०२/६०, दिनांक : २९ जानेवारी, १९९९.
४) क्रमांकः जिग्राप्र-२००५/प्र क्र-६५२/योजना-५,दिनांक : २३ नोव्हेंबर, २०१०.

**प्रस्तावना -**

या विभागाच्या संदर्भ क्र.४ अन्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांमधील,गट पातळीवरील यंत्रणा अधिक बळकट करण्यासाठी कार्यरत असलेल्या विस्तार अधिकारी (ए. ग्रा.वि.का.) (उद्योग) पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रमांतर्गत जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमध्ये सन १९९९ पर्यंत संदर्भाधीन २ व ३ अन्वये विस्तार अधिकारी (ए .ग्रा.वि.का.) ची एकूण ३२० पदे निर्माण करण्यात आलेली आहेत. तसेच सन १९८३ पर्यंत संदर्भ क्रमांक १ अन्वये विस्तार अधिकारी (उद्योग) ची एकूण २९६ पदे अशी एकूण ६१६ पदे निर्माण करण्यात आलेली आहेत.

त्यानंतर राज्यातील जिल्हयांची / तालुक्यांची पुनर्रचना झालेली आहे. सध्या राज्यात एकूण ३५१ पंचायत समित्या असून, प्रत्येक पंचायत समितीमध्ये १ विस्तार अधिकारी (ए .ग्रा.वि.का.) व १ विस्तार अधिकारी (उद्योग) प्रमाणे पदे आवश्यक आहेत. त्यामुळे नव्याने निर्माण झालेल्या

तालुक्यांकरिता व ज्या तालुक्यांकरिता ही पदे नाहीत त्या तालुक्यांकरिता विस्तार अधिकारी (एग्राविका) व (उद्योग) यांची पदे निर्माण करणे आवश्यक आहेत. या सर्व बाबींचा विचार करुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

ग्रामीण विकासाच्या दारिद्र्य निर्मूलनाच्या केंद्र पुरस्कृत योजना तालुका पातळीवर राबविण्यासाठी राज्यात प्रत्येक पंचायत समितीकरिता विस्तार अधिकारी (ए .ग्रा.वि.का.) चे एक पद आवश्यक असल्याने नव्याने निर्माण झालेल्या पंचायत समितीसाठी तसेच ज्या पंचायत समितीसाठी अशी पदे नाहीत तेथे प्रत्येकी १ पद प्रमाणे विस्तार अधिकारी (ए .ग्रा.वि.का.) ची ३१ पदे व विस्तार अधिकारी (उदयोग) ची ५५ पदे अशी एकूण ८६ पदे नव्याने निर्माण करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

२. सदर पदे रु. ९३००-३४८०० ग्रेडपे रु.४२०० च्या वेतनश्रेणीत निर्माण करण्यात येत आहेत.

३. सदर पदाचा चालू आर्थिक वर्षातील माहे जानेवारी, २०१२ ते मार्च, २०१२ या कालावधीतील, वेतनावरील खर्चासाठी हिवाळी अधिवेशन २०११ मध्ये पुरवणी मागणी सादर करण्यात येत असून त्याद्वारे मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर पदे जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांच्या अधिनस्त मंजूर करण्यात येत आहेत. सदर पदे संबंधित जिल्हापरिषदा व उद्योग विभाग यांच्याकडील अनुक्रमे विस्तार अधिकारी (ए .ग्रा.वि.का.) व(उद्योग) या संवर्गात तात्पुरती वाढ म्हणून समजण्यात यावी.

५. हा शासन निर्णय उच्चस्तरीय सचिव समितीने दि.३ सप्टेंबर, २०११ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार, वित्त विभागाच्या क्रमांकःपदनि-२०११/प्र.क्र.२१०/११/वित्तीय सुधारणा-१, दि.८.०९.२०११ अन्वये मिळालेल्या कार्यवृत्तातील सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनासच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आलेला असून त्याचा संगणक संकेतांक २०१११०२११२०३५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अविनाश सुभेदार

( अविनाश सुभेदार )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत**,

महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई
महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र २, नागपूर
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा(सर्व)
प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
सचिव,केंद्र सरकार,ग्रामीण विकास यंत्रणा,नवी दिल्ली
सचिव (कृषी) कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव (पदुम) कृषी व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव (सहकार) सहकार व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव, वित्त विभाग (व्यय -१५),मंत्रालय,मुंबई
प्रधान सचिव,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय,मुंबई
जिल्हाधिकारी(मुंबई व मुंबई उपनगरे वगळून)(सर्व)
विभागीय आयुक्त (सर्व)
अतिरीक्त संचालक, प्रकल्प आखणी व एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष (५ प्रती)
वित्त विभाग, (अर्थ-१७), व्यय-१५,वित्तीय सुधारणा-१.
ग्राम विकास विभाग,आस्था-७,आस्था-८,अर्थ संकल्प शाखा (का.क्र.वित्त-१)
संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालयमहाराष्ट्र राज्य,मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
कृषी संचालक,महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक,पशुसंवर्धन संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
उद्योग आयुक्त,नवीन प्रशासकिय भवन,मुंबई
सहकार आयुक्त व प्रबंधक सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, लेखा व कोषागारे, ,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
विशेष कार्य अधिकारी,(नियोजन)
कार्यासन क्र.आस्था-३,योजना-१,योजना-२,योजना-३,जल-२०,जल-१५, ग्राम विकास व जलसंधारण विभाग , मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती का.क्र.योजना-५, ग्राम विकास व जलसंधारण विभाग , मंत्रालय,मुंबई.